जिल्हा महिला व बालविकास अधिकारी, गट-अ व निरीक्षक प्रमाणित शासन व संस्था, गट-ब संयुक्त चाळणी परीक्षा - 2012



परीक्षा दि: 07/10/ 2012

CODE : **IOI**

प्रश्नपुस्तिका क्रमांक

BOOKLET NO.

**प्रश्नपुस्तिका**

**चाळणी परीक्षा / SCREENING TEST**

**वेळ : $1\frac{1}{2}$ ( दीड ) तास**

**एकूण प्रश्न : 150**

**एकूण गुण : 150**

# सूचना

(1) सदर प्रश्नपुस्तिकेत 150 अनिवार्य प्रश्न आहेत. उमेदवारांनी प्रश्नांची उत्तरे लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी या प्रश्नपुस्तिकेत सर्व प्रश्न आहेत किंवा नाहीत याची खात्री करून घ्यावी. असा तसेच अन्य काही दोष आढळल्यास ही प्रश्नपुस्तिका समवेक्षकांकडून लगेच बदलून घ्यावी.

(2) आपला परीक्षा-क्रमांक ह्या चौकोनांत **न विसरता बॉलपेनने** लिहावा.

| परीक्षा-क्रमांक | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | ↑ केंद्राची संकेताक्षरे | | | | | | | ↑ शेवटचा अंक |

(3) वर छापलेला प्रश्नपुस्तिका क्रमांक तुमच्या उत्तरपत्रिकेवर विशिष्ट जागी उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे **न विसरता नमूद करावा.**

(4) या प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाला 4 पर्यायी उत्तरे सुचविली असून त्यांना 1, 2, 3 आणि 4 असे क्रमांक दिलेले आहेत. त्या चार उत्तरांपैकी सर्वात योग्य उत्तराचा क्रमांक उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे तुमच्या उत्तरपत्रिकेवर नमूद करावा. अशा प्रकारे उत्तरपत्रिकेवर उत्तरक्रमांक नमूद करताना तो संबंधित प्रश्नक्रमांकासमोर छायांकित करून दर्शविला जाईल याची काळजी घ्यावी. **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

(5) सर्व प्रश्नांना समान गुण आहेत. यास्तव सर्व प्रश्नांची उत्तरे द्यावीत. घाईमुळे चुका होणार नाहीत याची दक्षता घेऊनच शक्य तितक्या वेगाने प्रश्न सोडवावेत. क्रमाने प्रश्न सोडविणे श्रेयस्कर आहे पण **एखादा प्रश्न कठीण वाटल्यास त्यावर वेळ न घालविता पुढील प्रश्नाकडे वळावे.** अशा प्रकारे शेवटच्या प्रश्नापर्यंत पोहोचल्यानंतर वेळ शिल्लक राहिल्यास कठीण म्हणून वगळलेल्या प्रश्नांकडे परतणे सोईस्कर ठरेल.

(6) उत्तरपत्रिकेत एकदा नमूद केलेले उत्तर खोडता येणार नाही. नमूद केलेले उत्तर खोडून नव्याने उत्तर दिल्यास ते तपासले जाणार नाही.

(7) **प्रस्तुत परीक्षेच्या उत्तरपत्रिकांचे मूल्यांकन करताना उमेदवाराच्या उत्तरपत्रिकेतील योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. तसेच ''उमेदवाराने वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरूपाच्या प्रश्नांची अचूक उत्तरेच उत्तरपत्रिकेत नमूद करावीत. अन्यथा त्यांच्या उत्तरपत्रिकेत सोडविलेल्या प्रत्येक चार चुकीच्या उत्तरांसाठी एका प्रश्नाचे गुण वजा करण्यात येतील''.**

**पर्यवेक्षकांच्या सूचनेविना हे सील उघडू नये**

SEAL

## ताकीद

**ह्या प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपेपर्यंत ही प्रश्नपुस्तिका आयोगाची मालमत्ता असून ती परीक्षाकक्षात उमेदवाराला परीक्षेसाठी वापरण्यास देण्यात येत आहे. ही वेळ संपेपर्यंत सदर प्रश्नपुस्तिकेची प्रत/प्रती, किंवा सदर प्रश्नपुस्तिकेतील काही आशय कोणत्याही स्वरूपात प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे कोणत्याही व्यक्तीस पुरविणे, तसेच प्रसिद्ध करणे हा गुन्हा असून अशी कृती करणाऱ्या व्यक्तीवर शासनाने जारी केलेल्या ''परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचा अधिनियम-82'' यातील तरतुदीनुसार तसेच प्रचलित कायद्याच्या तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.**

**तसेच ह्या प्रश्नपत्रिकेसाठी विहित केलेली वेळ संपण्याआधी ही प्रश्नपुस्तिका अनधिकृतपणे बाळगणे हा सुद्धा गुन्हा असून तसे करणारी व्यक्ती आयोगाच्या कर्मचारीवृंदापैकी, तसेच परीक्षेच्या पर्यवेक्षकीयवृंदापैकी असली तरीही अशा व्यक्तीविरूद्ध उक्त अधिनियमानुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती शिक्षेस पात्र होईल.**

**पुढील सूचना प्रश्नपुस्तिकेच्या अंतिम पृष्ठावर पहा**

1. पंजाब व हरियाणा राज्यांमध्ये गायींना विशिष्ट प्रकारचे इंजेक्शन लावून तिच्या शरीरातील जास्तीत जास्त रक्त - चरबी दुधात परिवर्तित केली जाते. हे गोमातेच्या शरीराचे कशा प्रकारचे शोषण आहे ?

(अ) प्राणी शोषण (ब) नैसर्गिक साधन संपदेचे शोषण

(क) जैविक शोषण (ड) प्राणी व जैविक शोषण

वरीलपैकी कोणता पर्याय योग्य आहे ?

(1) फक्त (अ) (2) फक्त (ब) (3) (अ) व (ब) (4) (ब) व (क)

2. काझदेन या संशोधिकेने वर्गात मुले का बोलत नाहीत, याचा शोध घेण्यासाठी, त्यांच्या घरांना भेटी देऊन, तेथील वातावरणाचे निरीक्षण केले. तेव्हा तिला आढळले की, ही मुले घरातील प्रौढ बोलत असतानाच मध्ये-मध्ये बोलतात. लहान मुलांनी बोलायचे नाही, तोंड खुपसायचे नाही, हा या संस्कृतीचा भाग नव्हता. या आधारे स्वत:च्या संशोधनासाठी पुढीलपैकी कोणती परिकल्पना मांडणे उपयुक्त ठरणार नाही ?

(1) मुलांना वाटेल तेव्हा बोलण्याची परवानगी दिली तर त्यांचा वर्गसहभाग वाढेल.

(2) मुलांच्या वर्गसहभागावर त्यांच्या कौटुंबिक संस्कृतीचा प्रभाव असतो.

(3) मुलांना लहान गटात विभागून त्यांना वाटणारा प्रौढांचा (अध्यापकांचा) दबाव काढून घेतला तर त्यांना वर्गसहभाग देता येईल.

(4) मुलांना अध्यापकाचे बोलणे पूर्ण झाल्यावरच बोलण्याची सवय लावली तर ती वर्गसहभाग देतील.

3. एखाद्या घटनेचा गृहित परिणाम किंवा कारण म्हणजे __________ होय.

(1) आश्रयी चल (2) स्वाश्रयी चल (3) बाह्य चल (4) स्वतंत्र चल

4. CHAT या साधनामुळे __________ .

(1) निरनिराळ्या युजर्सशी संभाषण करणे शक्य होते. (2) दुसऱ्या संगणकाशी लॉगइनची सुविधा मिळते.

(3) टेल-नेट ला जोडता येते. (4) वरील पैकी सर्व

5. महाराष्ट्र राज्यातून यादृच्छिक पद्धतीने चार जिल्हे निवडले व प्रत्येकी दोन तालुक्यातून 5 माध्यमिक शाळा अशा 40 शाळातून यादृच्छिक पद्धतीने प्रत्येकी 5 शिक्षक प्रमाणे 200 शिक्षक अभ्यासासाठी निवडले येथे कोणती नमुना निवड पद्धती वापरली ?

(1) स्तरीय यादृच्छिक नमुना निवड पद्धती (2) बहुस्तरीय यादृच्छिक नमुना निवड पद्धती

(3) यादृच्छिक गुच्छ नमुना निवड पद्धती (4) सहजप्राप्त नमुना निवड पद्धती

**कच्च्या कामासाठी जागा**

6. अध्ययनादरम्यान विद्यार्थ्याला स्वत:च्या आकलनाबाबत स्पष्टीकरणाची संधी देणे आवश्यक असते. त्यामुळे सुकरकाला (facilitator) त्याच्या आकलनाचे स्वरूप समजून घेऊन __________ .
   (1) कोणत्या अध्ययन कृती रचायच्या याबाबत निर्णय घेता येतो.
   (2) त्याची पातळी निश्चित करता येते.
   (3) त्याला योग्य शोधप्रश्न विचारून आकलन प्रगत पातळीवर नेण्यासाठी मदत करता येते.
   (4) वरील सर्व

7. एका संशोधकाने 'महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक समस्या' या विषयावर संशोधन करताना ज्या प्रतिसादकाला कोणत्याही समस्या नाहीत असा प्रतिसादक नमुन्यामधून वगळला आहे. तेव्हा संशोधक कोणती नमुना निवड पद्धती वापरतो ?
   (1) सहजप्राप्त नमुना निवड पद्धती (2) हिश्शेखानी पद्धती
   (3) सहेतुक नमुना निवड पद्धती (4) स्तरीय यादृच्छिक नमुना निवड पद्धती

8. पियाजेच्या बौद्धिक विकासाच्या अवस्थांचे संशोधन, स्किनरची साधक अभिसंधान *उपपत्ती* ही कोणत्या संशोधन पद्धतीची उदाहरणे आहेत ?
   (1) मूलभूत संशोधन पद्धती (2) उपयोजित संशोधन पद्धती
   (3) कृती संशोधन पद्धती (4) ऐतिहासिक संशोधन पद्धती

9. तुम्ही इंटरनेट द्वारा एकच पत्र अनेकांना पाठविले असता ते पत्र कोणाकोणाला पाठविले आहे हे जर इतरांना समजू द्यायचे नसेल तर त्यासाठी कोणता पर्याय वापरणार ?
   (1) CC (2) BCC (3) BB (4) AB

10. लिखित, आरेखित, जनसंवाद हे __________ प्रकार आहेत.
   (1) संवादाचे (2) संप्रेषणाचे (3) साहित्याचे (4) माहितीचे

11. एक संप्रेषण चक्र पूर्ण झाले म्हणजे संबंधित संदेश ग्राहकापर्यंत पोहोचला असे होत नाही याचे प्रमुख कारण म्हणजे प्रेषकाचे __________ .
   (1) संबंधित घटक वा घटनेसंबंधीचे सांकेतीकरण यथातथ्य असतेच असे नाही.
   (2) संप्रेषण माध्यमावर प्रभुत्व असतेच असे नाही.
   (3) घटक वा घटनेचे आकलन बुद्धिप्रमाण असतेच असे नाही.
   (4) वरील सर्व.

कच्च्या कामासाठी जागा

12. परिणामकारक वर्गसंप्रेषण होण्यासाठी या गोष्टींची गरज आहे :

(अ) शिक्षकांनी अवघड, अलंकारिक भाषेचा वापर करणे.

(ब) शिक्षकांनी व्यवस्थित नीटनेटका पोषाख करणे.

(क) शिक्षकांनी विषयांची तयारी चांगली करणे.

(ड) शिक्षकांना विद्यार्थ्यांबद्दल प्रेम व जिव्हाळा वाटणे.

वरीलपैकी कोणते विधान बरोबर आहे ?

(1) (अ) व (ब) (2) (क) फक्त

(3) (अ), (ब) व (क) (4) (ब), (क) व (ड)

---

13. नैसर्गिक, आपत्तींमध्ये या आपत्तींचा समावेश होतो :

(अ) भूकंप आणि त्सूनामी (ब) हिमखंड वितळणे व उल्कापात

(क) डेंग्यू ताप आणि लाळ्या खुरकुते (ड) पिकांवरील किटकनाशक फवारणी आणि नरबळी

वरीलपैकी कोणते पर्याय बरोबर आहेत ?

(1) (अ), (ब) आणि (क) (2) (ब), (क) आणि (ड)

(3) (क), (ड) आणि (अ) (4) (अ), (ब) आणि (ड)

---

14. प्रत्येक अध्यापकाने स्वत:ची गुणवत्ता सिद्ध करणे राष्ट्रीय मूल्यमापन आणि अधिस्वीकृती परिषदेकडून अनिवार्य केले आहे. याच्या परिणामी सर्व विद्यार्थ्यांची अध्ययन गुणवत्ता वाढेल असे म्हणता येणार नाही कारण ——

(1) अध्यापकांनी स्वत:ची जबाबदारी आत्मीयतेने पार पाडली तर अध्ययन होणारच.

(2) अनेक विद्यार्थ्यांना शिकणे / अध्ययन म्हणजे काय हे समजत नाही. त्यामुळे ते फक्त प्रमाणपत्रालाच महत्त्व देतात.

(3) अध्यापक स्वत:च्या ज्ञानभाषक दर्जाचे लेखापरीक्षण करून स्वत:तील त्रुटी दूर करतील.

(4) अध्यापक व विद्यार्थी हे अध्ययनशील समूह म्हणून कार्यरत राहून एखादी समस्या जबाबदारीने सोडवतील.

---

15. त्वचेच्या कर्करोगाचे प्रमाण वाढण्याचे कारण काय ?

(1) ओझोनचा थर विरळ झाला. (2) अतिनिल किरणामुळे

(3) हरितगृह परिणामामुळे (4) वरील एक व दोन

---

16. काही विद्यार्थ्यांच्या वर्तनात अस्थिरता व चंचलता दिसते त्याचे कारण त्यांच्या मध्ये :

(1) थायरॉक्सिन स्त्राव अधिक प्रमाणात पाझरतो. (2) पिट्युटरीन स्त्राव अधिक प्रमाणात पाझरतो.

(3) ॲड्रिनलीन स्त्राव अधिक प्रमाणात पाझरतो. (4) एन्ड्रोजन स्त्राव अधिक प्रमाणात पाझरतो.

---

**कच्च्या कामासाठी जागा**

**17.** शिक्षण क्षेत्रात कार्य केलेल्या एखाद्या विचारवंताचे शैक्षणिक तत्वज्ञान आत्मसात करण्यासाठी पुढीलपैकी कोणता/ते स्व-विकसन उपक्रम करणे उपयोगी ठरणार नाही ?

(1) त्या विचारवंताची पुस्तके वाचून त्यावर भाषणे/पुस्तके तयार करणे.

(2) त्या विचारवंताच्या तत्वज्ञानाचा चिकित्सक अभ्यास करून त्यावर शोध प्रबंध लिहिणे.

(3) त्या विचारवंताचे तत्वज्ञान अभ्यासक्रमात सामील करण्यासाठी चळवळ उभारणे.

(4) वरील सर्व निरुपयोगी.

---

**18.** युनेस्कोने पर्यावरण शिक्षणाचा प्रसार व प्रचार करण्याच्या उद्देशाने कोणाच्या मदतीने आंतरराष्ट्रीय पर्यावरण शिक्षण कार्यक्रम अमलात आणला ?

(1) WHO (2) WWF (3) IEEP (4) UNEP

---

**19.** विजयने परीक्षेत मराठी विषयात 65 गुण, हिन्दीत 81 गुण, इंग्रजी व समाजशास्त्रात क्रमश: 40 व 73 गुण आणि 75 गुण विज्ञानात व 86 गुण गणितात मिळविले तर त्याच्या गुणांचे मध्यमान किती येईल ?

(1) 68 (2) 66 (3) 70 (4) 72

---

**20.** स्वत:ची संप्रेषण कौशल्ये विकसित करण्यासाठी अध्यापकांनी, स्वत:च्या अध्यापन विषयातील संकल्पना, सखोल व व्यापक करणे गरजेचे आहे. त्यामुळे त्यांना प्रामुख्याने __________ .

(1) स्वत:चे काम कमी वेळेत करता येईल.

(2) बहुमाध्यमांच्या मदतीने विद्यार्थ्यांसाठी यथातथ्य अध्ययन अनुभव रचणे शक्य होईल.

(3) पॉवर पॉईंट वापरून अध्यापन आकर्षक करता येईल.

(4) बहुमाध्यम तंत्राचा वापर करता येईल.

---

**21.** चांगल्या प्रबंध लेखनाची वैशिष्ट्ये कोणती ?

(अ) आकर्षकपणा आणि शास्त्रीय व वस्तुस्थितीदर्शक (ब) पुनरावृत्तीस आळा

(क) व्यवहार्यता आणि संतुलित भाषा (ड) अडचणी व कमतरतेचा उल्लेख

वरीलपैकी कोणते विधान बरोबर आहे ?

(1) (अ) आणि (ब) फक्त (2) (ब) आणि (क) फक्त

(3) (अ), (ब) आणि (क) (4) वरील सर्व विधाने

---

**कच्च्या कामासाठी जागा**

22. दूरस्थ शिक्षणाची वैशिष्ट्ये कोणती ?

(अ) दूरस्थ शिक्षणामध्ये एखादी संस्था / यंत्रणा कार्यान्वित असते.

(ब) शिक्षक व विद्यार्थी यांना एकत्रित आणण्यासाठी माध्यमांचा उपयोग केला जातो.

(क) दोन्ही बाजूंनी संप्रेषण होण्यासाठी साधने पुरविली जातात.

(ड) अध्ययन हे सामूहिक स्वरूपात न होता व्यक्तिगत स्वरूपात होते.

वरीलपैकी कोणती विधाने बरोबर आहेत ?

(1) (अ) आणि (ब) (2) (ब) आणि (क) (3) (क) आणि (ड) (4) वरील सर्व

23. मानसशास्त्रज्ञांच्या मते अध्ययन म्हणजे __________.

(अ) वर्तनबदल (ब) गुणाचा व अवगुणाचा विकास

(क) टिकाऊ स्वरूपाचे वर्तन बदल (ड) निरीक्षण, अनुकरण, प्रशिक्षण यामुळे घडून आलेला बदल

(इ) वर्तन बदल घडवून आणण्याचा प्रयत्न करणे.

पर्यायी उत्तरे :

(1) फक्त (अ) (2) फक्त (ब)

(3) (अ) आणि (क) (4) (अ) (ब) (क) (ड) आणि (इ)

24. दृश्य संप्रेषणात __________ याचा समावेश होतो.

(1) फोटोग्राफ (2) चित्रे (3) आकृत्या (4) यापैकी सर्व

25. माहिती तंत्रज्ञानातील पारंपारिक तंत्रामध्ये __________ चा समावेश होतो.

(1) संकलन (2) संपादन (3) पुनर्मुद्रण (4) वरील सर्व घटक

26. ज्ञानरचना करण्यासाठी पोषक असे वातावरण रचतांना विद्यार्थी समूहांना __________ तर प्रत्येक सदस्याला स्वत:ची अध्ययनकृती उत्क्रान्त करणे शक्य होईल.

(1) व्यापक स्वरूपाच्या संकल्पनासंदर्भात, प्रक्रिया करण्याची व स्वत:च्या पद्धतीने अभिव्यक्ती करण्याची मुभा दिली.

(2) नेमक्या संकल्पनासंदर्भात, नेमक्या स्वरूपाची अभिव्यक्ती करण्याची अट घातली.

(3) मुक्तअंत स्वरूपाच्या कृती करून, स्वत:च्या पद्धतीने निर्मिती करण्याची मोकळीक दिली.

(4) वरीलपैकी एक व तीन योग्य.

**कच्च्या कामासाठी जागा**

**27.** आलेख काढण्याची तत्वे कोणती ?

(अ) आलेख काढण्यासाठी योग्य प्रमाण निवडावे.

(ब) आलेखाला स्पष्ट व समावेशक शीर्षक असावे.

(क) *Y*- अक्षावरील चलांची सुरूवात शून्यापासून करावी.

(ड) आकडेवारीचा संदर्भ सांगावा.

वरीलपैकी कोणती विधाने बरोबर आहेत ?

(1) (अ), (ब) आणि (क)
(2) (ब), (क) आणि (ड)
(3) (क), (ड) आणि (अ)
(4) वरील सर्व

---

**28.** नीती शिक्षण म्हणजे हे होय :

(1) योग्य मनोवृत्तींचा विकास व प्रेरक शक्तींचा विकास.
(2) मानवाच्या भौतिक व सांस्कृतिक उन्नतीवर भर देणे.
(3) तार्किकतेवर आधारलेल्या नितीमत्तेचा पुरस्कार करणे.
(4) सामाजिक समतेचा पुरस्कार करणे.

---

**29.** क्रियात्मक विकासाचा डॉ. दवे यांनी सुचवलेला क्रम कोणता ?

(1) अनुकरण, अचुकता, क्रियाकौशल्य, संधीकरण, स्वाभाविकीकरण
(2) अनुकरण, क्रियाकौशल्य, अचुकता, संधीकरण, स्वाभाविकीकरण
(3) अनुकरण, अचुकता, संधीकरण, क्रियाकौशल्य, स्वाभाविकीकरण
(4) अनुकरण, क्रियाकौशल्य, अचुकता, स्वाभाविकीकरण, संधीकरण

---

**30.** गुणात्मक आधारसामग्री मध्ये __________ .

(1) माहिती सादरीकरणाचे प्रारूप पूर्वनिश्चित केले जाते.
(2) संकलित माहिती सारणीत मांडणे शक्य असते.
(3) साधनांशिवाय माहितीचे संकलन केले जाते.
(4) साधनाने निश्चित केलेल्या प्रतिसादांच्या रूपातच माहिती संकलित होते.

---

**31.** अपरिचिताला परिचिताच्या पातळीवर आणणे आणि परिचिताला अपरिचिताच्या पातळीवर आणणे या सूत्राचा _________ विचारावर आधारित अध्ययन प्रतिमानात जाणीवपूर्वक वापर केला जातो.

(1) उद्‌गामी (2) सर्जन (3) अवगामी (4) चिकित्सक

---

**कच्च्या कामासाठी जागा**

32. वर्गामध्ये विद्यार्थ्यांचे परस्पर संबंध कसे आहेत हे तपासण्यासाठीचे सध्या प्रचलित असलेले साधन कोणते ?
(1) संकलित नोंदपत्रक (2) प्रक्षेपण पद्धती (3) समाजमिती (4) प्रासंगिक नोंदी

33. तुम्हाला तात्पुरता प्रोग्राम व डेटा साठवून ठेवावयाचा आहे तर तुम्ही कोणत्या मेमरीचा उपयोग कराल ?
(1) RAM (2) ROM (3) C D (4) DVD

34. एक्सेलमध्ये तुम्हास $C_4$ ते $C_{10}$ या सेलमधील अंकांची सरासरी काढायची असेल तर तुम्हास कोणते सूत्र टाईप करावे लागेल ?
(1) = Average (C4 : C10) (2) = Average (C4/C10)
(3) = Average (C4 ; C10) (4) = Average $\left(\frac{C_4 + C_{10}}{C}\right)$

35. संप्रेषणाची __________ उपपत्ती मानवी व्यवहारांच्या दृष्टिकोनाची उपपत्ती आहे.
(1) लक्ष्याचे केंद्र (2) पिंग-पाँग (3) सर्पिल (4) माहिती

36. परीक्षेत नापास होणारा विद्यार्थी शिक्षकांनी नीट शिकविले नाही असे सांगून आपल्या दोषांना झाकण्याचा प्रयत्न करतो. इथे विद्यार्थी कोणती संरक्षण यंत्रणा वापरतो ?
(1) नकारात्मकता (2) आत्मताडन (3) प्रक्षेपण (4) उदात्तीकरण

37. हॉवर्ड गार्डनर यांच्या बहुविध बुद्धिमत्ता सिद्धांतानुसार :
(1) प्रत्येकाच्या बुद्धिमत्ता विशेषांची नोंद करता येईल परंतु कोण कुशाग्र वा कोण बुद्धिमंद हे ठरवणे अयोग्य ठरेल.
(2) प्रत्येक विद्यार्थ्याच्या बुद्धिमत्ता नोंदीवरून एखादा विद्यार्थी कोणत्या स्वरूपाचे कार्य ताण न येता करेल याबाबत अंदाज बांधता येईल.
(3) कोणता विद्यार्थी कुशाग्र वा बुद्धिमंद हे ठरवता येईल.
(4) वरील (1) व (2)

38. सर्व विद्याशाखांमधील संशोधनास सहाय्य व प्रोत्साहन देण्यासाठी संशोधन छात्रवृत्ती आणि शिक्षक छात्रवृत्तीची योजना सुरु करणारी संस्था कोणती ?
(1) एन.सी.ई.आर.टी. (2) सी.ए.एस.ई. (3) एन.सी.टी.ई. (4) यु.जी.सी.

**कच्च्या कामासाठी जागा**

39. व्यक्तित्वाच्या सुप्त व अबोध मनात दडलेल्या या प्रवृत्तीचा दडपल्या गेलेल्या इच्छावासनांचा शोध घेण्यासाठी ________ या मूल्यमापन पद्धतीचा उपयोग करतात.

(1) प्रक्षेपण (2) पडताळासूची (3) प्रासंगिक नोंदी (4) पदनिश्चयन श्रेणी

---

40. $$\text{Mdn} = L + i\left(\frac{N/2 - F}{f}\right)$$

वरील सूत्रात $f$ चा अर्थ काय ?

(1) ज्या वर्गांतरात मध्यांक आहे त्याची नीचतम मर्यादा.

(2) वर्गांतर लांबी.

(3) ज्या वर्गांतरात मध्यांक आहे त्या वर्गांतराच्या खालच्या वर्गांतरापर्यंतची संचयी वारंवारिता.

(4) मध्यांक ज्या वर्गांतरात येतो त्या वर्गांतराची वारंवारिता.

---

41. शून्य वा नकारात्मक परिकल्पना मांडण्याचे पुढीलपैकी सर्वात योग्य कारण कोणते ?

(1) अनुमानात्मक तसेच वर्णनात्मक सांख्यिकी विश्लेषणासाठी तसे करण्याचा प्रघात आहे.

(2) नकारात्मक परिकल्पनेशी विसंगत असा पुरावा दिला तर ती नाकारण्याचे सशक्त तार्किक समर्थन करता येते.

(3) शून्य परिकल्पनेमुळे सांख्यिकी तंत्रे वापरण्याची शक्यता निर्माण होते.

(4) नकारात्मक परिकल्पनेमुळे प्रयोग फसला तरी त्याचा ठपका संशोधकावर येत नाही.

---

42. लोकसहभागाने पर्यावरणाचे संरक्षण करता येते हे प्रत्यक्षात आणणाऱ्या चळवळीचे नेतृत्व करण्याची प्रथा कोणी सुरू केली ?

(1) डॉ. सलीम अली (2) श्री. सुंदरलाल बहुगुणा

(3) श्री. मारुती चितमपल्ली (4) डॉ. माधवराव गाडगीळ

---

43. अनुमानात्मक सामग्री विश्लेषणात टी–चाचणी वापरण्याचे पुढीलपैकी कोणते कारण योग्य नाही ?

(1) एकाच लोकसंख्येतून नियंत्रित व प्रायोगिक गट निवडले जातात.

(2) एकाच लोकसंख्येतून अनमान–धपक्याने (लॉटरी) सदस्य निवडूनही नियंत्रित व प्रायोगिक गट समान असतातच असे नाही.

(3) शून्य परिकल्पनेबाबत तसे करणे आवश्यक असते.

(4) कोणत्याही दोन न्यादर्शांची तुलना करण्यासाठी तो निष्कर्षात्मक पुरावा ठरतो.

---

**कच्च्या कामासाठी जागा**

44. व्हॉयगॉत्सकीच्या ''समिपस्थ टप्पा'' या संकल्पनेनुसार व्यक्तीला, ________ .

(1) स्वत:ला जे काही करणे जमते, त्याआधारे पुढच्या पातळीला जायला पुरेसा आधार देऊन शक्य तेवढ्या लवकर तो काढून घ्यावा.

(2) शिकण्याच्या सर्व सोयी उपलब्ध करून तिचे शिकणे पूर्ण होईपर्यंत आधार द्यायला हवा.

(3) तिला काय जमते तेवढेच चांगल्याप्रकारे करण्यासाठी लागणारी सर्व मदत द्यायला हवी.

(4) व्यक्तीला तिच्या पद्धतीने शिकायला आवश्यक सुविधा पुरवायला हव्यात.

---

45. प्राथमिक सामग्री ही दुय्यम सामग्रीपेक्षा अधिक ________ असते.

(1) विश्वसनीय (2) सप्रमाण (3) यथार्थ (4) पर्याप्त

---

46. आवृत्ती वितरण बिंदूरेखीय चित्राचे कोणते प्रकार आहेत ?

(अ) आवृत्ती आयत चित्र (ब) आवृत्ती बहुभूज

(क) आवृत्ती चक्र (ड) एक चल कालिक चक्र

वरील प्रकारातील कोणता पर्याय बरोबर आहे ?

(1) फक्त (अ) (2) (ब) आणि (क)

(3) (अ), (ब) आणि (क) (4) फक्त (ड)

---

47. संजयने यादृच्छिक निवड पद्धतीने दोन समान गट निवडले परंतु पूर्व चाचणी न देता एका गटास प्रायोगिक गट समजून त्यास प्रायोगिक पद्धतीने शिकविले व दुसऱ्या गटास नियंत्रित गट समजून पारंपारिक पद्धतीने शिकविले, तर संजयने कोणता प्रायोगिक अभिकल्प वापरला ?

(1) यादृच्छिक निवड-दोन गट - उत्तर चाचणी अभिकल्प

(2) दोन गट - यादृच्छिक जोडी निवड अभिकल्प

(3) दोन गट - यादृच्छिक निवड - पूर्व व उत्तर चाचणी अभिकल्प

(4) दोन गृहित समान गट - फक्त उत्तर चाचणी अभिकल्प

---

48. इंटरनेट वरील हवी असलेली माहिती कमी वेळेत पुरविणारे सर्च टूल कोणते ?

(अ) सर्च इंजिन (ब) डिक्शनरी (क) डिरेक्टरी (ड) वेब डिरेक्टरी

वरीलपैकी कोणता पर्याय बरोबर आहे ?

(1) (अ) आणि (ब) (2) (अ) आणि (क) (3) (अ) आणि (ड) (4) वरील सर्व

---

**कच्च्या कामासाठी जागा**

49. PPT आधारित संप्रेषणाचे शैक्षणिक मूल्य अजमावण्यासाठी प्रश्नावली, निरीक्षणपत्र, संपादन चाचणी व मुलाखत आराखडा तयार करताना कोणत्या गोष्टींवर भर देणे योग्य ठरेल ?

(1) साहित्याच्या मनोरंजन मूल्यामुळे विद्यार्थ्यांना ते लक्षात ठेवणे सोपे गेले वा नाही.

(2) संबंधित संकल्पना व प्रक्रियेच्या आधारे विद्यार्थी विविध काठिण्यपातळीच्या समस्या सोडवू शकले वा नाही.

(3) संबंधित संकल्पना व प्रक्रियेच्या आधारे विद्यार्थी पूर्वनिर्धारित प्रश्नांची आदर्श उत्तरे लिहू शकले वा नाहीत.

(4) संबंधित संकल्पना व प्रक्रिया विद्यार्थी सत्रान्तापर्यन्त लक्षात ठेवू शकले वा नाही.

50. आपत्ती व्यवस्थापनासाठी खालील कोणत्या घटकांची गरज आहे ?

(1) यंत्रणेची बांधणी (2) सामाजिक संघटनेची मदत

(3) नागरिकांना जाणीव करुन देणे (4) वरील सर्व

51. राष्ट्रीय शिक्षक शिक्षण परिषद (NCTE) चे पदसिद्ध अध्यक्ष कोण ?

(1) केंद्रीय मानव संसाधन विकास खात्याचे राज्यमंत्री (2) राष्ट्रीय शैक्षणिक व प्रशिक्षण परिषदेचे संचालक

(3) शिक्षण मंत्री (4) केंद्रीय मानव संसाधन मंत्री

52. गरजेनुसार मनुष्य बळाचा विकास झाला तर देशाच्या ____________ झालेली दिसून येईल.

(अ) लोकसंख्येत वाढ (ब) देशाच्या संरक्षण व्यवस्थेत वाढ

(क) उत्पादकतेत वाढ (ड) मानवाची वाढ

वरीलपैकी कोणते विधान बरोबर आहे ?

(1) (अ) आणि (ब) (2) (ब) आणि (क) (3) फक्त (क) (4) (क) आणि (ड)

53. संप्रेषण प्रक्रियेची ____________ ही पायरी नाही.

(1) माहितीची निश्चिती (2) अवबोध

(3) सांकेतिकीकरण (4) नि:सांकेतिकीकरण

54. "वेब क्वेस्ट" या पद्धतीने अध्ययन वातावरण रचण्यासाठी सुकरकाने कोणत्या/ती कृती करणे आवश्यक ठरते ?

(1) संबंधित सूत्राच्या (Theme) संदर्भात माहिती मिळवण्यासाठी व आवश्यक कृती करण्यासाठी जोडण्या (Links) उपलब्ध करणे.

(2) विद्यार्थ्यांनी काय करावे, ते कोणत्या प्रकारे करून कोणती निर्मिती अपेक्षित आहे ते स्पष्ट करणे.

(3) कशा रीतीने स्वाध्याय सुपूर्द करायचे आहेत व त्यांचे मूल्यनिर्धारण कोणत्या निकषांवर केले जाईल हे स्पष्ट करणे.

(4) वरील सर्व

**कच्च्या कामासाठी जागा**

55. सध्या उपलब्ध झालेल्या मनोवैज्ञानिक अंत:दृष्टिनुसार प्रयोज्याच्या समस्या, अभ्यासवस्तू बद्दलच्या अभिवृत्ती, दृष्टिकोन इत्यादीचे मूलस्रोत समजून घेण्यासाठी प्रामुख्याने कोणत्या प्रकारच्या मुलाखतीचा उपयोग करणे उचित ठरेल ?

(1) निदानात्मक (2) परिचयात्मक (3) उपचारात्मक (4) वरील (1) व (3)

56. पुढील यादीतील कोणता घटक "ट्विटर" या सामाजिक माध्यमाचे वैशिष्ट्य नाही ?

(1) दृक्-श्राव्य माहितीचे आदान-प्रदान (2) हॅशटॅग (#) चा सामाईक दुवा म्हणून उपयोग

(3) 150 अक्षरांची लेखी माहिती (4) दृक्-श्राव्य माहितीची संकेत स्थळे.

57. लिखित संप्रेषण प्रभावी होण्यासाठी हा घटक आवश्यक आहे :

(अ) एक संघपणा (ब) सुसंगती

(क) संक्षिप्तता (ड) टिप्पणी काढणे

वरीलपैकी कोणता घटक बरोबर आहे ?

(1) (अ) व (ब) (2) (ब) व (क)

(3) (अ), (ब) आणि (क) (4) (ब), (क) आणि (ड)

58. एकच कसोटी निरनिराळ्या प्रसंगी निरनिराळ्या गटांना दिली असता प्राप्तांकामध्ये लक्षणीय फरक पडत नसेल तर ती कसोटी __________ समजली जाते.

(1) विश्वसनीय (2) सप्रमाण (3) प्रमाणित (4) समवर्ती सप्रमाण

59. हवेच्या प्रदूषणाची मानवनिर्मित कारणे ही होय :

(अ) श्वासोच्छवास (ब) आण्विक प्रकल्प

(क) औष्णिक प्रकल्प (ड) मानवी वसाहती

वरीलपैकी कोणते कारण बरोबर आहे ?

(1) फक्त (अ) (2) (अ), (ब) आणि (क)

(3) (ब), (क) आणि (ड) (4) (क), (ड) आणि (अ)

60. समुदाय सेतुजालामुळे (Social networking) अध्ययनशील समूहांचे, निरंतर अध्ययन गतिमान होण्याच्या शक्यता वाढतात कारण त्यातून, समव्यासंगी व्यक्ती परस्परांशी __________ .

(1) एकाच वेळी किंवा सोयीनुसार संपर्कात राहतात. (2) ई-मेल द्वारे संपर्कात राहतात.

(3) बहुमाध्यमांतून आदान-प्रदान करतात. (4) वरील सर्व

**कच्च्या कामासाठी जागा**

61. अनेक लहान संगणक एका मध्यवर्ती संगणका बरोबर सरळ जोडले असतील तर अशा नेटवर्कला काय म्हणतात ?

(1) बस नेटवर्क
(2) स्टार नेटवर्क
(3) रिंग नेटवर्क
(4) वरीलपैकी कोणतेही नाही

62. ई-मेल द्वारा दुसऱ्या विषयी नाराजी व्यक्त करण्यासाठी खालीलपैकी कोणत्या चिन्हाचा उपयोग मेल मध्ये कराल ?

(1) :-)
(2) :-(
(3) ;-)
(4) :-O

63. शिक्षणात गुणात्मक सुधारणा घडवून आणण्यासाठी भारत सरकारने NCERT च्या अधिपत्याखाली राज्यस्तरावर कार्य करणाऱ्या, कोणत्या संस्थेची स्थापना केली ?

(1) राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद
(2) राज्य शिक्षण मंडळ
(3) राज्य शिक्षक शिक्षण मंडळ
(4) राज्य शिक्षक मंडळ

64. तंत्रज्ञानी व व्यावसायिक शिक्षणाचे योग्य व्यवस्थापन आणि अपेक्षित प्रगतीसाठी रेड्डी समितीने राष्ट्रीय शैक्षणिक धोरणामध्ये प्रस्तावित __________ या संस्थेच्या नियमांमध्ये आवश्यक ते संशोधन करण्याची सूचना दिली.

(1) भारतीय शिक्षण सेवा संस्था
(2) जिल्हा शिक्षण आणि प्रशिक्षण संस्था
(3) अखिल भारतीय तंत्रज्ञान शिक्षण परिषद
(4) दि सेंट्रल इंस्टिट्यूट ऑफ एज्युकेशन टेक्नॉलॉजी

65. इलेक्ट्रॉनिक माध्यमातून उपलब्ध असलेल्या फेस-बुक, मल्टिप्लाय यासारख्या समुदाय-जालांचा उपयोग करून स्वत:ची गुणवत्ता वाढवून, स्वत:ला सक्षम करण्यासाठी, व्यक्तींना मदत द्यायची असेल तर शालेय पातळीवर पुढीलपैकी कोणत्या गोष्टीला प्राधान्य दिले पाहिजे ?

(1) मूलभूत अध्ययन कौशल्ये प्राप्त करणे.
(2) इंग्रजी भाषेवर प्रभुत्व प्राप्त करणे.
(3) संगणक कौशल्यांचा वापर करून निर्मितीक्षम (generic) अध्ययन कौशल्ये प्राप्त करणे.
(4) चिकित्सक विचार कौशल्ये प्राप्त करणे.

66. शैक्षणिक संस्थेने निर्माण केलेल्या भौतिक सुविधांच्या संबंधित समूहासाठी जास्तीत जास्त योग्य उपयोग करण्याचे मार्गदर्शन कोठून उपलब्ध होईल ?

(1) गॅरी योजना
(2) बटाव्हिया योजना
(3) स्थानिक समूहाच्या शैक्षणिक गरजा लक्षात घेऊन समूहानेच योजना रचायची.
(4) (1) व (3)

**कच्च्या कामासाठी जागा**

67. 26 जुलै 2005 रोजी मुंबईमध्ये झालेल्या अतिवृष्टीचा अंदाज कुलाबा वेधशाळेस देता न येण्याचे कारण ________ हे होय.

(अ) वेधशाळेत अद्ययावत डॉप्लर रडार यंत्रणेचा अभाव होता.

(ब) रिश्टर स्केल मापन यंत्रणेचा अभाव होता.

(क) तांत्रिक प्रशिक्षण व नियोजन यंत्रणेचा अभाव होता.

(ड) आपत्ती व्यवस्थापन यंत्रणेचा अभाव होता.

वरीलपैकी हे विधान बरोबर आहे.

(1) फक्त (अ)
(2) (अ) आणि (ब)
(3) (ब) आणि (क)
(4) (क) आणि (ड)

---

68. मनोवैज्ञानिक दृष्टिकोनातून शैक्षणिक संशोधनात, दोन समतुल्य गट तयार करून, चल नियंत्रित करता येतात व प्रयोग करता येतो असे म्हणणे चुकीचे आहे. याचे पुढीलपैकी कोणते कारण अयोग्य आहे ?

(1) व्यक्तिभिन्नतेमुळे दोन समतुल्य गट तयार करणे अशक्य आहे.

(2) मेंदूविषयक अद्ययावत संशोधनातून सिद्ध झाले आहे की एकाच समूहातील, एकाच लिंगाच्या, एकाच कुटुंबातील दोन व्यक्तींच्या मेंदूतील भेद टोकाचा असतो.

(3) काही व्यक्तींजवळ बौद्धिक क्षमता नसते.

(4) स्त्री व पुरुष यांच्या मेंदूत असणाऱ्या भिन्नतेच्या तुलनेत दोन स्त्रिया वा पुरुष यांच्या मेंदूतील भेद टोकाचा असतो.

---

69. अन्न-प्रदूषण म्हणजे ________ असे म्हणता येईल.

(1) व्यावसायिक स्तरावर नफ्याचे प्रमाण वाढवण्यासाठी केलेल्या उपायांमुळे खाद्य पदार्थात आरोग्यास घातक विविध पदार्थ व जीव मिसळणे.

(2) खाद्य वस्तू व पदार्थ नीट न साठवल्या/ठेवल्यामुळे ते स्वास्थास अपायकारक ठरणे.

(3) खाद्य वस्तू व पदार्थ दीर्घकाळ टिकावेत यासाठी त्यात शरीराला अपायकारक रसायने मिसळणे.

(4) वरील सर्व

---

70. प्राथमिक सामग्री मिळविण्याच्या पद्धतीत ________ ही पद्धती समाविष्ट होत नाही.

(1) विशिष्टाभ्यास
(2) प्रश्नावली
(3) मुलाखत
(4) विशिष्ट वृत्त

---

**कच्च्या कामासाठी जागा**

**पुढील उतारा वाचून प्रश्न क्रमांक 71 ते 75 या प्रश्नांची उत्तरे द्या.**

महात्मा गांधी हा असा एकच माणूस होता, की ज्याने आपल्या देशाची उभारणी नैतिक पायावर उभारण्याचा प्रकल्प हाती घेतला. गांधीजींच्या बरोबर जे पुढारी होते, त्यांची देश उभारणीची कल्पना ही मोठमोठे प्रकल्प, अवजड कारखाने, शेतीची सुधारणा, शहरांचा विकास, संसदेची स्थापना अशा गोष्टींभोवती केंद्रित झाली होती. गांधीजींच्या मात्र बरोबर लक्षात आलं, की आपल्या देशापुढचा खरा प्रश्न हा नीतीचा आहे. आपण नीतिवान असू, नैतिक दृष्ट्या योग्य असू, तरच आपला खरा विकास होऊ शकेल. नीती हा शब्द आपल्याला फार मोठा वाटतो आणि ही काहीतरी अवघड गोष्ट वाटते. पण प्रत्यक्षात नीतीने वागणे म्हणजे खरेपणाने वागणे. आपल्या सगळ्या व्यवहारात, मग तो व्यवहार घरात असो, दारात असो, गावात असो की समाजात; आपण खरेपणाने वागायला पाहिजे एवढंच गांधीजींचं म्हणणं होतं. ही गोष्ट महत्त्वाची आहे कारण आपल्याला दिसतंय, की आपल्यापुढचा खरा प्रश्न नीतीचा म्हणजे 'नियत'चा आहे. आपल्या देशात साधन संपत्तीची किंवा बुद्धिमत्तेची कमतरता नाही. पण आपल्यापुढे जे प्रश्न निर्माण होत आहेत त्याचं कारण आपल्या लोकांची नियत साफ नाही हे आहे. कोणत्याही क्षेत्रात बघा, राजकारण घ्या, नोकरशाही घ्या, व्यापाराचं क्षेत्र घ्या, प्रत्येक ठिकाणी हेच दिसेल की नियत खराब आहे म्हणून प्रश्न निर्माण होतात. गांधीजी ही नियत साफ करण्याचा उद्योग आयुष्यभर करत होते.

दुसरी गोष्ट म्हणजे गांधीजींना आपला देश कसा आहे याची अचूक जाण होती. या देशातील प्रतिष्ठित, धनवान उच्चवर्गीय लोकांना समाजातल्या गरीब, श्रमिक लोकांविषयी सहानुभूती नसल्याने ते देशाचा विकास करताना सगळ्या संपत्तीची लूट करतील आणि कष्टकरी लोकांना त्यांचा वाटा देणार नाहीत, याची त्यांना पुरेपूर कल्पना होती. म्हणून त्यांनी सर्वोदयाची कल्पना मांडली. सर्वोदय म्हणजे सगळ्यांचा उदय असे वाटले तरी त्याचा प्रत्यक्षातला अर्थ प्रत्येकाचा उदय असा आहे. आपल्या देशात गरिबीचे व विषमतेचे काही विशिष्ट प्रश्न आहेत, म्हणून आपली विकासपद्धती वेगळी असली पाहिजे, असे त्यांचे म्हणणे होते. बऱ्याच लोकांना असे वाटते की गांधीजींच्या पद्धतीने विकास म्हणजे देशाला मध्ययुगात न्यायचे. अशी गैरसमजूत करून घेण्याचे कारण नाही. विकासाच्या नावाखाली अन्याय आणि हिंसा होऊ नये, असे त्यामागचे साधे तत्व आहे. एकाचा फायदा व दुसऱ्याचा तोटा, असा विकास करायला घेतला की समाजात असंतोष वाढतो. त्याऐवजी सर्व समाज स्वस्थ, संपन्न व समाधानी होईल, अशी विकासाची पद्धत हवी.

---

71. गांधीजींना अभिप्रेत असलेली विकासाची पद्धत कोणती ?
    (1) आवश्यक त्या सुखसोई सर्वांना आवश्यक त्या प्रमाणात मिळाव्यात.
    (2) साधी-सोपी हातयंत्रे वापरून उद्योग-व्यवसाय करावेत.
    (3) सर्वांनी उत्पादक श्रमात सहभाग घ्यावा
    (4) (1) व (3) पर्याय योग्य

---

72. प्रत्येकाने खरेपणाने वागायला हवं, एवढंच गांधीजींना म्हणायचं आहे असं लेखक म्हणतो कारण :
    (1) खरं वागणं फार सोपं आहे असं त्याला वाटत असावं व खरं वागण्याचे दुष्परिणाम त्याला माहीत नसावेत.
    (2) एकट्याने खरे वागण्याला काही अर्थ नसतो ही वस्तुस्थिती, लेखकाने अनुभवलेली नसावी.
    (3) खरे वागण्याची आवश्यक ती किंमत, सर्वांनी चुकवली तर ते सर्वांच्याच सोईचे होईल, असे त्याला वाटत असावे.
    (4) सर्व लोक खरेपणाने वागले तर देशातील साधनसंपत्तीचा व बुद्धिमत्तेचा सर्वांना उपयोग होईल, असे लेखकाला म्हणायचे असेल.

---

**कच्च्या कामासाठी जागा**

73. सर्वोदय म्हणजे सगळ्यांचा उदय असे वाटले तरी त्याचा प्रत्यक्षातला अर्थ प्रत्येकाचा उदय असा आहे. या विधानावरील कोणती प्रतिक्रिया सर्वात योग्य ठरेल ?

(1) सगळ्यांचा म्हटलं काय नि प्रत्येकाचा म्हटलं काय, एकूण एकच.

(2) सगळ्यांचा उदय म्हटलं तर व्यक्तिगत विकासाला वावच उरणार नाही.

(3) ज्याला स्वत:चा विकास साधणे शक्य नाही, त्याला लागणारी सर्व मदत देण्याची जबाबदारी समाजाला घ्यावी लागेल.

(4) प्रत्येकाने आपापला विकास साधून घ्यायला हवा हेच खरं.

---

74. गांधीजींना नीती, विकासाच्या केंद्रस्थानी हवी आहे याचा अर्थ, त्यांना ____________ .

(1) मोठमोठे प्रकल्प, अवजड कारखाने, शेतीची सुधारणा, शहरांचा विकास, संसदेची स्थापना, इत्यादी खर्चिक गोष्टी महत्त्वाच्या वाटत नव्हत्या.

(2) माणसाला विकासाच्या केंद्रस्थानी आणण्याची, चिरंजीवी पर्यावरण विकासाची गरज त्यांच्या दूरदृष्टीला शंभर वर्षापूर्वीच दिसली होती.

(3) माणसाला नीतिमत्तेच्या बळावर स्वत:ची हाव काबूत ठेवता आली, तर कोणत्याही स्वरूपातील साधन संपत्तीचा लाभ, समाजातील सर्वांना मिळेल असे त्यांना वाटत होते.

(4) भारतीय समाजातील कोणतीही व्यक्ती, प्रतिष्ठा व धन यांच्या जोरावर उच्च वर्गीय स्तरात पोहोचली की, ती गरिबांची व श्रमिकांची दखल घेणार नाही, याची त्यांना खात्री होती.

---

75. गांधीजींच्या नियत साफ करण्याच्या आयुष्यभर चाललेल्या उद्योगातला सर्वात कठीण भाग कोणता होता ?

(1) लोकांना सत्याचे महत्त्व पटवून देण्यासाठी देशभर दौरे करणे.

(2) लोकांना सत्याचे महत्त्व पटवून देण्यासाठी वृत्तपत्रात लेखन करणे.

(3) लोकांना सत्याचे महत्त्व पटवून देण्यासाठी सांघिक प्रार्थना करणे.

(4) लोकांना काही सांगण्यापूर्वी, स्वत: सत्य, अहिंसा इत्यादी मूल्यांना धरून वागणे.

---

**कच्च्या कामासाठी जागा**

**पुढील उतारा वाचून त्यावर आधारित प्रश्न क्रमांक 76 ते 80 ची उत्तरे द्या.**

प्राचीन भारतात काही काळ वैदिकांची ब्राम्हण संस्कृती, जैनांची श्रमण संस्कृती आणि बौद्धांची भिक्षू संस्कृती अशा जणू तीन वेगवेगळ्या संस्कृती चालल्या. त्यांच्यात संघर्षही दीर्घकाळपर्यंत चालला होता. पण धम्मपदात त्या संघर्षाचा मागमूस नाही. सगळीकडे निर्मळ समभाव दिसून पडतो. गाथा 142 काय म्हणते पहा – 'जो कोणाही जिवाला दंड देत नाही, तो ब्राम्हण आहे, तो श्रमण आहे, तो भिक्षू आहे'. गीतेतील 'स संन्यासी च योगी च' हे वचन कोणालाही या ठिकाणी आठवल्याशिवाय राहायचे नाही. आज आम्ही संन्यासी आणि योगी यांचा नाहक वाद माजवित असतो आणि आम्ही स्वत: संन्यासी आणि योगी यापैकी काहीच नसतो! गीता दोहोंकडे समत्व बुद्धीने पाहते. दोघांना एकरूप समजते. अशी थोरांची थोरवी आहे.

गीतेत स्थितप्रज्ञ, योगी, जीवनमुक्त, योगारूढ, भक्त, गुणातित, इत्यादि अनेक नावांनी आदर्श पुरुषांची वर्णने ठिकठिकाणी आली आहेत. धम्मपदातही तसेच केले आहे. सहावा अध्याय पंडित-लक्षण, सातवा अर्हत लक्षण, 14 वा बुद्ध लक्षण, 19 वा धार्मिक लक्षण, 25 वा भिक्षू लक्षण आणि 26 वा शेवटचा अध्याय ब्राम्हण लक्षण अशी सहा ठिकाणी आदर्श पुरुषाची लक्षणे मांडली आहेत. लक्षणे सगळी मिळून एकच आहेत. यातील अर्हत हे जैन नाव आहे. ब्राम्हण वैदिक आहे. दोन्ही नावांचा गौतम बुद्धांनी आदर केला आहे. धम्मपदाचा अभ्यासी सर्वधर्म समभाव राखू शकतो. तो संकुचित वृत्तीचा होऊच शकत नाही.

भगवान बुद्धाची सगळी शिकवण धम्मपदात येते. पुढे त्यांच्या शिष्यांनी सृष्टीविज्ञान, तिची उत्पत्ती वगैरे विषयांबद्दल बरेच लिहिले. त्यात तत्वज्ञानाचा अंश होता आणि त्याचे खंडनमंडनही झाले. परंतु त्याचे खंडन, भगवान बुद्धांच्या धार्मिक शिकवणीवर आक्षेप होता म्हणून झाले असे नाही. बुद्धांच्या विचारांची बरीच साधकबाधक चर्चा झाली, परंतु त्यांनी जी सामाजिक, नैतिक आणि धार्मिक शिकवण दिली, तिला जरासाही विरोध असता तर त्यांची गणना अवतारांमध्ये झाली नसती.

---

**76.** भगवान बुद्धांची शिकवण आणि गीतेतील वचन यातील साम्य कोणते ?

(1) संन्यासी आणि योगी मानवतेचा आधार आहेत. (2) समानभाव सर्वत्र असावा.

(3) प्रत्येक व्यक्ती भिन्न आहे. (4) वरील सर्व

---

**77.** जो दुसऱ्याला दंड देत नाही तो खरा __________ .

(1) ब्राम्हण आहे. (2) श्रमण आहे. (3) भिक्षू आहे (4) वरील सर्व

---

**78.** भगवान बुद्धांची शिकवण __________ .

(1) नीति मूल्यांवर आधारलेली होती. (2) सर्व मानव जातीमध्ये समानभाव ठेवणारी होती.

(3) स्वत:च्या धर्माला उच्चस्थानी मानणारी होती. (4) धर्म, समाज, नीतिमत्ता यांचा आदर करणारी होती.

---

**79.** उताऱ्याला योग्य शीर्षक काय द्याल ?

(1) ब्राम्हणांचा गौरव (2) भगवान बुद्धांचे कार्य

(3) भगवान बुद्ध (4) भगवान बुद्धांचा समभाव

---

**कच्च्या कामासाठी जागा**

80. धम्मपदातील कोणत्या अध्यायामध्ये विद्वानांच्या संबंधी उल्लेख आहे ?

(1) 14 वा (2) 25 वा (3) 19 वा (4) 6 वा

81. सर्वांगीण बालविकास योजनेचे उद्दिष्ट खालीलप्रमाणे आहेत :

(अ) पूरक आहार, लसीकरण व अनौपचारीक शिक्षण

(ब) पर्यावरण, व पोषणविषयक शिक्षण.

(क) संरक्षक अन्नपदार्थांचे उत्पादन

(ड) अन्नाची नासाडी थांबविण्यासाठी मार्गदर्शन

पर्यायी उत्तरे :

(1) फक्त (अ) (2) फक्त (अ) आणि (ब)

(3) (अ), (क) आणि (ड) (4) (ब), (क) आणि (ड)

82. समाज पोषणात खालीलपैकी कोणत्या समस्येचा समावेश होतो ?

(1) सामाजिक समस्या (2) मानसशास्त्रीय समस्या

(3) कुपोषणविषयक समस्या (4) शिक्षण विषयक समस्या

83. बालकाच्या सामाजिक समायोजनेसाठी खालील विकास महत्वपूर्ण ठरतात :

(अ) मानसिक विकास (ब) शारीरिक विकास

(क) शैक्षणिक विकास (ड) सांस्कृतिक विकास

पर्यायी उत्तरे :

(1) फक्त (अ) (2) (अ) आणि (ब)

(3) (अ), (ब) आणि (क) (4) (अ), (क) आणि (ड)

84. आयुष्यातील सगळ्यात लहान अवस्था कोणती ?

(1) गर्भावस्था (2) नवजात अवस्था (3) पूर्व शालेय अवस्था (4) शालेय अवस्था

**कच्च्या कामासाठी जागा**

85. उपचारात्मक आहार तयार करण्याकरीता आहारात कोणते परिवर्तन करावे लागते ?

(अ) रुग्णाच्या अवस्थेनुसार आहाराची निवड करुन (ब) पोषक घटकांच्या प्रमाणात बदल करुन

(क) आहार घेण्याच्या वेळेत बदल न करुन (ड) पोषणाच्या पद्धतींमध्ये बदल करुन

पर्यायी उत्तरे :

(1) फक्त (अ) (2) फक्त (अ) आणि (ब)

(3) (अ), (ब) आणि (क) (4) (अ), (ब) आणि (ड)

---

86. एकात्मिक बाल विकास सेवेचे लाभार्थी खालीलपैकी कोणत्या वयोगटातील असतात ?

(1) 0 - 6 (2) 6 - 12 (3) 12 - 18 (4) यापैकी नाही.

---

87. जागतिक स्तरावर मानवी हक्कांची संकल्पना खालीलपैकी कोणत्या साली मान्य झाली ?

(1) 1970 (2) 1975 (3) 1980 (4) 1985

---

88. बालकाच्या मस्तकानुवर्ती विकासात :

(अ) प्रथम बालक डोके वर उचलतो व नंतर छाती, शरीरमध्य उचलण्याचा प्रयत्न करतो.

(ब) प्रथम बालक आवाजाच्या दिशेने डोळे वळवत नाही.

(क) प्रथम बाहुंवर ताबा येतो व नंतर हातांवर ताबा येतो.

(ड) प्रथम झोपविलेल्या स्थितीत कुशीवर वळतो.

पर्यायी उत्तरे :

(1) फक्त (अ) (2) फक्त (अ) आणि (ब)

(3) (अ), (ब) आणि (क) (4) (अ), (क) आणि (ड)

---

89. बाल न्याय कायदा 1986 या हेतुने करण्यात आला :

(अ) 18 वर्षाखालील मुलगा व 16 वर्षाखालील मुलगी हे बालक मानले जावे.

(ब) मुलांचा शैक्षणिक व मानसिक विकास करणे.

(क) मुलांचा भावनात्मक छळापासून बचाव करणे.

(ड) मुलांचा शारीरिक दुरुपयोगापासून बचाव करणे.

पर्यायी उत्तरे :

(1) फक्त (अ) (2) (अ) आणि (ब)

(3) (अ), (ब) आणि (क) (4) (अ), (क) आणि (ड)

---

**कच्च्या कामासाठी जागा**

90. बाल हक्क संरक्षण आयोगाची स्थापना :

(1) 24 जुलै 2007 (2) 24 जुलै 2005

(3) 24 जुलै 2006 (4) वरीलपैकी कधीही नाही

---

91. अनाथ आणि परित्यक्त माता कोणत्या घरकुलाच्या प्रमुख असतात ?

(1) अनुरक्षण गृह (2) विशेष गृह (3) बालगृह (4) बालग्राम

---

92. रक्तात असणाऱ्या प्रथिनाला काय म्हटले जाते ?

(1) मायोसीन (2) फायब्रीनोजन (3) केसीन (4) व्हिटेलीन

---

93. बाल अपराध्यांवर उपचार करण्याकरीता खालील पद्धतींचा वापर केला जातो :

(अ) मानसशास्त्रीय पद्धती (ब) कायदेशीर पद्धती

(क) क्रिडात्मक पद्धती (ड) उपचारात्मक पद्धती

पर्यायी उत्तरे :

(1) फक्त (अ) (2) फक्त (अ) आणि (ब)

(3) (अ), (क) आणि (ड) (4) (अ), (ब) आणि (क)

---

94. एक ग्रॅम प्रथिनांमधून किती उष्मांक मिळतात ?

(1) 10 (2) 08 (3) 06 (4) 04

---

95. पूर्व बाल्यावस्थेतील सामाजिक विकास कोणत्या वयात होतो ?

(1) 2 ते 5 वर्षे (2) 2 ते 6 वर्षे (3) 3 ते 5 वर्षे (4) 2 ते 7 वर्षे

---

96. बालकाचा विकास हा नेहमी __________ .

(1) विशेषाकडून सामान्याकडे होतो. (2) फक्त अन्तर्गत होतो.

(3) सामान्याकडून विशेषाकडे होतो. (4) फक्त बहिर्गत होतो.

---

**कच्च्या कामासाठी जागा**

97. तृणाणु किंवा त्यांचे विष असलेल्या पदार्थांच्या सेवनाने कोणती अन्नविषबाधा होते ?

(1) सालमोनेला अन्नविषबाधा
(2) स्टॅफिलोकॉकस अन्नविषबाधा
(3) बॉट्युलिझम अन्नविषबाधा
(4) वरील सर्व अन्नविषबाधा

---

98. बालकाचा सर्वांगीण विकास खालील सिद्धांतानुसार होतो :

(अ) विकास व्यक्तिपरत्वे भिन्न असतो.

(ब) विकासाच्या निरनिराळ्या अंगामध्ये परस्पर संबंध असतो.

(क) विकास सातत्याने होत नाही.

(ड) विकास विशेषत्वाकडून सामान्याकडे होतो.

पर्यायी उत्तरे :

(1) फक्त (अ)
(2) फक्त (अ) आणि (ब)
(3) (अ), (ब) आणि (क)
(4) (अ), (क) आणि (ड)

---

99. बालकाच्या सामाजिक विकास अध्ययन पद्धती :

(1) निरीक्षण पद्धती
(2) समाज मिती पद्धती
(3) पदनिश्चयन पद्धती
(4) आयुर्मानात्मक पद्धती

---

100. जीवनसत्वांचे वर्गीकरण कशाप्रकारे केले जाते ?

(अ) प्राणीज व वनस्पतीज जीवनसत्वे

(ब) जलद्राव्य व स्निग्धद्राव्य जीवनसत्वे

(क) सेंद्रीय व असेंद्रीय जीवनसत्वे

(ड) द्रव व घन जीवनसत्वे

पर्यायी उत्तरे :

(1) फक्त (अ)
(2) फक्त (ब)
(3) (अ), (क) आणि (ड)
(4) (अ), (ब) आणि (क)

---

**कच्च्या कामासाठी जागा**

**101.** आत्महत्या केलेल्या शेतकरी कुटुंबांना सहाय्य करण्यासाठी पंतप्रधान व महाराष्ट्र शासन यांनी पॅकेजेस् जाहीर केली आहेत. शेतकरी कुटुंबांना मदत द्यायला पात्र ठरविण्यासाठी खालीलपैकी कोणते निकष आहेत ?

(अ) त्या शेतकऱ्याच्या नावाने जमीन असली पाहिजे.

(ब) कर्ज बँकेकडून घेतलेले असले पाहिजे.

(क) बँकेने परतफेडीचा तगादा लावला असला पाहिजे.

(ड) सलग तीन वर्षे शेतकऱ्याचे नुकसान झालेले असले पाहिजे.

पर्यायी उत्तरे :

(1) (अ), (ब) आणि (क) (2) (अ), (ब) आणि (ड)

(3) (ब), (क) आणि (ड) (4) (अ), (क) आणि (ड)

---

**102.** हिंदू दत्तक कायदा 1956 अन्वये दत्तक घेणाऱ्या महिलेचे किमान वय आणि दत्तक जाणाऱ्या मुलाचे किंवा मुलीचे कमाल वय किती असते ?

(1) 36 वर्षे आणि 21 वर्षे (2) 21 वर्षे आणि 18 वर्षे

(3) 15 वर्षे आणि 15 वर्षे (4) 18 वर्षे आणि 15 वर्षे

---

**103.** समाजशास्त्रीय दृष्ट्या व्यक्तीला जन्माने प्राप्त होणाऱ्या दर्जास आणि त्याच्या स्वकर्तृत्वाने प्राप्त होणाऱ्या दर्जास अनुक्रमे असे म्हणतात –

(1) नियमित आणि अनियमित दर्जा (2) अर्जित आणि अर्पित दर्जा

(3) सामाजिक आणि वैवाहिक दर्जा (4) वरीलपैकी कोणतेही नाही.

---

**104.** 2011 च्या जनगणनेमध्ये कोणत्या निकषानुसार शिरगणती नसल्याने सरकारला अभ्यासकांच्या कडक समीक्षणाला सामोरे जावे लागले ?

(1) धर्मनिहाय निकष (2) भाषानिहाय निकष

(3) जातिनिहाय निकष (4) भौतिक साधनसामग्री निकष

---

**105.** देवदासी प्रथा नष्ट करण्यासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी कोणत्या ठिकाणी परिषद घेतली होती ?

(1) नागपूर (2) माणगाव (3) महाड (4) निपाणी

---

**कच्च्या कामासाठी जागा**

106. सामाजिक समस्या ही :

(1) तटस्थ संकल्पना आहे. (2) व्यापक संकल्पना आहे.

(3) संकुचित संकल्पना आहे. (4) यापैकी कोणतेही नाही.

---

107. व्यक्ति केंद्रित समुपदेशन ही संकल्पना कोणी मांडली ?

(1) कार्ल रॉजर्स (2) मिचेल (3) नॉर्मन मन (4) शेल्डन

---

108. समन्वित बाल विकास योजनेमध्ये (आयसीडीएस्) खालीलपैकी कोणत्या सुविधा अंतर्भूत आहेत ?

(अ) अंगणवाडी (ब) पोलिओ निर्मूलन

(क) शालेय विद्यार्थ्यांना दुपारचा आहार (ड) बाल सुधार गृहे

पर्यायी उत्तरे :

(1) फक्त (अ) आणि (ड) (2) फक्त (अ) आणि (क)

(3) फक्त (ब) आणि (ड) (4) फक्त (अ) आणि (ब)

---

109. भारताच्या राष्ट्रीय ज्येष्ठ नागरिक धोरणाची अमेरिकेच्या ज्येष्ठ नागरिक धोरणाशी तुलना केली असता, भारताच्या धोरणामध्ये खालीलपैकी कोणत्या गोष्टींवर भर दिला गेला आहे ?

(1) वैद्यकीय सुविधा (2) कायद्याच्या सुविधा

(3) स्वयंसेवी संस्थावर अवलंबित्व (4) कुटुंब व्यवस्थेचे बळकटीकरण

---

110. बाल कामगार प्रथा निर्मूलन कायदा कोणत्या साली अस्तित्वात आला ?

(1) इ.स. 1988 (2) इ.स. 1987 (3) इ.स. 1986 (4) इ.स. 1984

---

111. भारताचे उपराष्ट्रपती म्हणून दुसऱ्यांदा पद भुषविणाऱ्या व्यक्ती ओळखा –

(अ) डॉ. राधाकृष्णन् (ब) डॉ. राजेंद्रप्रसाद

(क) डॉ. हमीद अन्सारी (ड) डॉ. शंकर दयाळ शर्मा

पर्यायी उत्तरे :

(1) (अ), (ब) (2) (ब), (क) (3) (क), (ड) (4) (अ), (क)

---

**कच्च्या कामासाठी जागा**

**112.** कोणत्या भारतीय खेळाडूंना भारतीय लष्करातील लेफ्टनंट कर्नल ही पदवी देण्यात आली ?

(अ) सुशिलकुमार (ब) अभिनव बिंद्रा (क) महेंद्रसिंग धोनी (ड) गगन नारंग

पर्यायी उत्तरे :

(1) (अ), (ड) (2) (ब), (क) (3) फक्त (अ) (4) फक्त (ड)

---

**113.** 'ASEAN' संघटनेच्या परराष्ट्र मंत्र्यांची जुलै 2012 मध्ये परिषद कोठे भरली होती ?

(1) नॉमपेन्ह (Phnom Penh) (2) सिंगापूर

(3) मनिला (4) बँकॉक

---

**114.** महाराष्ट्रात 'कृषी दिवस' कधी पाळला जातो ?

(1) 1 जुलै (2) 5 जून (3) 10 डिसेंबर (4) 8 मार्च

---

**115.** 2012 चा रॅमन मॅगसेसे पुरस्कार कोणास जाहिर झाला आहे ?

(1) फुलंदेई फ्रान्सिस (2) सत्यदेव दुबे (3) विजय केळकर (4) देवेंद्र मेहता

---

**116.** 31 में 2012 च्या राष्ट्रीय युवा धोरणानुसार कोणत्या वयोगटातील व्यक्तींना युवा म्हटले जाणार आहे ?

(1) 13 ते 35 वर्षे वयोगट (2) 16 ते 30 वर्षे वयोगट

(3) 18 ते 30 वर्षे वयोगट (4) 15 ते 30 वर्षे वयोगट

---

**117.** ग्रामिण विकास मंत्रालयाने सुवर्णजयंती ग्रामविकास योजनेला खालीलपैकी कोणते नाव दिले आहे ?

(1) राष्ट्रीय मिशन (2) राज्य अजिविका मिशन

(3) राष्ट्रीय अजिविका मिशन (4) राष्ट्रीय विकास मिशन

---

**118.** 2012 मध्ये आध्यात्मिक क्षेत्रात केलेल्या बहुमोल कामगिरीबद्दल जॉन टेम्पल्टन फाऊंडेशनकडून ________ यांचा टेम्पल्टन पुरस्काराने गौरव करण्यात आला.

(1) बाबा आमटे (2) दलाई लामा (3) नाना धर्माधिकारी (4) रामदेव बाबा

---

**119.** अमिताभ बच्चन यांना कोणत्या विद्यापीठाने डि.लिट् ही पदवी बहाल केली ?

(1) मुंबई विद्यापीठ (2) ऑक्सफर्ड विद्यापीठ

(3) बनारस हिंदू विद्यापीठ (4) यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र विद्यापीठ

---

**कच्च्या कामासाठी जागा**

**120.** 2012 चे खेलरत्न पुरस्कार कोणाला मिळालेले आहेत ?

(अ) विजय कुमार (ब) नरसिंग यादव (क) अदित्य मेहता (ड) योगेश्वर दत्त

पर्यायी उत्तरे :

(1) (अ), (ब) (2) (ब), (क) (3) (क), (ड) (4) (अ), (ड)

---

**121.** महाराष्ट्रातील जागतिक दर्जाचे ढग संशोधन केंद्र कोणते आहे ?

(1) महाबळेश्वर (2) भिमा-शंकर (3) कळसूबाईचे शिखर (4) त्र्यंबकेश्वर

---

**122.** मानवाधिकाराबाबत चुकीचे विधान कोणते ?

(1) मानवाधिकार हे अंगभूत, अत्याज्य व समान असतात.

(2) मानवाधिकार हे अमर्यादित असतात.

(3) मानवाधिकार उगमाने सामाजिक असतात

(4) मानवाधिकार हे कायद्याच्या फलस्वरूप प्राप्त होतात.

---

**123.** महाराष्ट्र राज्याने ई-पंचायत (E-Panchayat) योजनेत खालीलपैकी कोणते स्थान मिळविले आहे ?

(1) पहिले स्थान (2) दुसरे स्थान

(3) तिसरे स्थान (4) यापैकी कोणतेहीनाही

---

**124.** अमिर खान यांच्या 'सत्यमेव जयते' या दुरदर्शनवरील मालिकेमुळे जिनेरिक ड्रग (Generic Drug) हा शब्द सर्वांना माहित झाला. Generic Drug मुळे ग्राहकांना कोणता फायदा होतो ?

(1) ते विकसित देशात अत्यंत कडक निकष लावून तयार केले जातात म्हणून ग्राहकाला त्यापासून सर्वोच्च सुरक्षितता व गुणवत्ता मिळते.

(2) ते फक्त जेनेटिक रोगांवर प्रभावी उपाय करतात.

(3) जिनेरिक ड्रग (Generic Drug) हे पेटंटविषयी अधिकार संपल्यामुळे अत्यंत स्वस्त मिळतात.

(4) यापैकी कोणतेही नाही.

---

**125.** 'रिसर्च अँड अनॅलिसिस विंग्ज' ही गुप्तचर संस्था कोणत्या देशाची आहे ?

(1) पाकिस्तान (2) रशिया (3) भारत (4) अमेरिका

---

**कच्च्या कामासाठी जागा**

126. जोड्या लावा :

| | (अ) | | (ब) |
|---|---|---|---|
| (अ) | फेसबुक | (i) | जिमी बेल्स |
| (ब) | गुगल | (ii) | स्टिव्ह जॉब्ज |
| (क) | ॲपल | (iii) | मार्क झुकर बर्ग |
| (ड) | विकीपिडीया | (iv) | लॅरी पेज व सर्जी ब्रीन |

| | (अ) | (ब) | (क) | (ड) |
|---|---|---|---|---|
| (1) | (ii) | (iii) | (iv) | (i) |
| (2) | (i) | (ii) | (iii) | (iv) |
| (3) | (iv) | (ii) | (i) | (iii) |
| (4) | (iii) | (iv) | (ii) | (i) |

127. सर्व शिक्षा अभियानांतर्गत विकलांग समावेशन शिक्षण हा कार्यक्रम कोणासाठी महाराष्ट्रात राबविला जातो ?

(1) शारीरिक विकलांग मुलांसाठी
(2) मानसिक विकलांग मुलांसाठी
(3) सर्वसाधारण मुलांसाठी
(4) शारीरिक व मानसिक विकलांग मुलांसाठी

128. पहिला 'प्राचार्य शिवाजीराव भोसले स्मृती सम्मान' पुरस्कार कोणास देण्यात आला ?

(1) द.मा. मिरासदार
(2) बाबासाहेब पुरंदरे
(3) रामदास फुटाणे
(4) ना.धों. महानोर

129. गुजरात परिवर्तन पार्टीची स्थापना कोणी केली ?

(1) नरेंद्र मोदी
(2) लाल कृष्ण आडवाणी
(3) केशुभाई पटेल
(4) शंकरसिंह वाघेला

130. योग्य जोड्या लावा.

| | 'अ' | | 'ब' |
|---|---|---|---|
| (अ) | गोवा | (i) | तरुण गोगाई |
| (ब) | पंजाब | (ii) | विजय बहुगुणा |
| (क) | उत्तराखंड | (iii) | प्रकाशसिंग बादल |
| (ड) | आसाम | (iv) | मनोहर पर्रीकर |

| | (अ) | (ब) | (क) | (ड) |
|---|---|---|---|---|
| (1) | (ii) | (iii) | (i) | (iv) |
| (2) | (i) | (ii) | (iii) | (iv) |
| (3) | (iii) | (iv) | (i) | (ii) |
| (4) | (iv) | (iii) | (ii) | (i) |

**कच्च्या कामासाठी जागा**

**131.** खाली दिलेल्या संकेतांचा अभ्यास करून दिलेल्या शब्दाचे सांकेतिक रूप पर्यायामधून निवडा :

| A | B | C | D | E | F | G | ----- |
|---|---|---|---|---|---|---|---|
| # | ○ | ✱ | □ | △ | # | ○ | ----- |

BREADTH

(1) △ ✱ △ # △ □ □ (2) ✱ △ ○ # ○ □ △

(3) ○ ✱ △ # □ △ ✱ (4) # △ # □ △ ○ ✱

**132.** रिकाम्या जागी योग्य अंक लिहा –








(1) 44 (2) 55 (3) 80 (4) 88

**133.** राम आणि सीता उत्तरेच्या दिशेने निघाले. 10 किमी चालून गेल्यावर सीता डावीकडे आणि राम उजवीकडे वळला. सीता 5 किमी. आणि राम 3 किमी चालून गेल्यावर थांबले. नंतर ते आपापल्या जागेवरून 15 किमी दक्षिणेला चालत गेले तर सीता रामपासून किती अंतरावर आहे ?

(1) 15 किमी (2) 10 किमी (3) 8 किमी (4) 12 किमी

**134.** विसंगत अक्षरगट ओळखा –

JNeW, BiFS, MSqA, WZTu

(1) JNeW (2) BiFS (3) MSqA (4) WZTu

**135.** अ × ब चा अर्थ अ हा ब चा भाऊ आहे.

अ – ब चा अर्थ ब ही अ ची बहीण आहे.

अ ÷ ब चा अर्थ अ ही ब ची आई आहे.

अ + ब चा अर्थ ब हे अ चे वडील आहेत.

खालीलपैकी कोणते विधान म ही न ची पुतणी आहे हे दर्शविते ?

(1) क – म ÷ न (2) क – म + ड × न (3) क – म + न × ड (4) क ÷ म + ड × न

**कच्च्या कामासाठी जागा**

**136.** एका सांकेतिक भाषेत 175 चा अर्थ "hill is green" असा होतो, 723 चा अर्थ "tree looks green" असा होतो व "tree is tall" या साठी 129 असा संकेत वापरतात. तर "tall green tree" साठी खालीलपैकी कोणता संकेत येईल ?

(1) 971 (2) 527 (3) 297 (4) 912

---

**137.** एका रांगेत 40 मुले उत्तरेकडे तोंड करून उभी आहेत. सतीश हा अजयच्या उजवीकडे आठवा आहे. जर अजय हा उजव्या टोकाकडून अठरावा असेल तर सतीश डाव्या टोकाकडून कोणत्या क्रमांकावर असेल ?

(1) 32 (2) 10 (3) 31 (4) 29

---

**138.** प्रश्नचिन्हाच्या जागी योग्य अंक लिहा –

5, 11, 23, 47, __?__.

(1) 95 (2) 63 (3) 86 (4) 89

---

**139.** अ हा ब चा मुलगा आहे, ब ची बहिण क हिला ड नावाचा मुलगा आणि म नावाची मुलगी आहे. स हे ड चे मामा आहेत. तर स हा अ चा कोण ?

(1) पुतण्या (2) काका (3) मामा (4) आजोबा

---

**140.** खाली दिलेल्या संकेतांचा अभ्यास करून दिलेल्या शब्दाचे सांकेतिक रूप पर्यायामधून निवडा.

| A | B | C | D | E | F | G | ..... |
|---|---|---|---|---|---|---|---|
| # | ○ | ✱ | □ | △ | # | ○ | ..... |

SHADE

(1) # △ # □ ✱ (2) △ □ △ ✱ # (3) ○ △ □ # ✱ (4) □ # ✱ △ □

---

**141.** एका सांकेतिक भाषेत 723 चा अर्थ "juice to drink" असा होतो, 157 चा अर्थ "bread to eat" असा होतो व "eat and drink" यासाठी 354 असा संकेत वापरतात, तर "juice and bread" साठी खालीलपैकी कोणता संकेत येईल ?

(1) 324 (2) 712 (3) 142 (4) 437

---

**कच्च्या कामासाठी जागा**

**142.** व्हेन आकृतीचे निरीक्षण करून उत्तर लिहा -




एकूण स्त्रियांपैकी किती स्त्रिया डॉक्टर्स आहेत ?

(1) 35 (2) 40 (3) 20 (4) 05

---

**143.** प्रश्नार्थक चिन्हाच्या जागी कोणती संख्या येईल ?




(1) 87 (2) 10 (3) 20 (4) 154

---

**144.** ÷ हे चिन्ह + दर्शविते , – हे चिन्ह × दर्शविते, + हे चिन्ह ÷ दर्शविते, × हे चिन्ह – दर्शविते, तर खालील समीकरणाची किंमत काढा -

$16 \div 8 \times 6 - 2 + 12$

(1) 22 (2) 23 (3) 24 (4) 25

---

**145.** सोनूचे वय मनूच्या वयाच्या 2/3 आहे. पाच वर्षांनी सोनू 45 वर्षाचा होईल तर मनूचे आजचे वय किती ?

(1) 55 वर्षे (2) 56 वर्षे (3) 58 वर्षे (4) 60 वर्षे

---

**146.** कोणत्या दोन चिन्हांची अदलाबदल केली असता खालील विधान सत्य होईल ?

$5 + 3 \times 8 - 12 \div 4 = 3$

(1) + आणि – (2) – आणि ÷ (3) + आणि × (4) + आणि ÷

---

**कच्च्या कामासाठी जागा**

**147.** रिकाम्या जागी योग्य संख्या लिहा :

210, 177, 144, 111, ___?___.

(1) 89 (2) 77 (3) 110 (4) 78

---

**148.** B शहर, A शहराच्या ईशान्येला 20 मैलावर आहे, आणि C शहर A शहराच्या वायव्येला 20 मैलावर आहे. तर C शहर B च्या कोणत्या दिशेला आहे ?

(1) उत्तर (2) पश्चिम (3) पूर्व (4) दक्षिण

---

**149.** रिकाम्या जागी योग्य पर्याय लिहा :












(1) $\frac{\text{न}}{16}$ (2) $\frac{8}{\text{च}}$ (3) $\frac{\text{क}}{12}$ (4) $\frac{\text{ज}}{10}$

---

**150.** सुनीता 3 किमी उत्तरेकडे चालली, नंतर डावीकडे वळून 2 किमी चालली. नंतर डावीकडे वळून 3 किमी चालली. पुन्हा उजवीकडे वळून 3 किमी चालली तर सुरवातीच्या ठिकाणापासून ती किती अंतरावर आणि कोणत्या दिशेला उभी आहे ?

(1) 5 किमी, पश्चिम (2) 5 किमी, पूर्व (3) 6 किमी, पश्चिम (4) 6 किमी, दक्षिण

---

- o 0 o -

**कच्च्या कामासाठी जागा**

**सूचना** — (पृष्ठ 1 वरून पुढे....)

(8) प्रश्नपुस्तिकेमध्ये विहित केलेल्या विशिष्ट जागीच कच्चे काम (रफ वर्क) करावे. प्रश्नपुस्तिकेव्यतिरिक्त उत्तरपत्रिकेवर वा इतर कागदावर कच्चे काम केल्यास ते कॉपी करण्याच्या उद्देशाने केले आहे, असे मानले जाईल व त्यानुसार उमेदवारावर शासनाने जारी केलेल्या "परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचे अधिनियम-82" यातील तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.

(9) सदर प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपल्यानंतर उमेदवाराला ही प्रश्नपुस्तिका स्वत:बरोबर परीक्षाकक्षाबाहेर घेऊन जाण्यास परवानगी आहे. **मात्र परीक्षा कक्षाबाहेर जाण्यापूर्वी उमेदवाराने आपल्या उत्तरपत्रिकेचा भाग-1 समवेक्षकाकडे न विसरता परत करणे आवश्यक आहे.**

## नमुना प्रश्न

प्र. क्र. 201. आधुनिक विचारसरणीनुसार शिक्षणाच्या प्रक्रियेतील केंद्रबिंदु कोण?

(1) शिक्षण संस्था (2) शिक्षक

(3) विद्यार्थी (4) अभ्यासक्रम

ह्या प्रश्नाचे योग्य उत्तर "(3) विद्यार्थी" असे आहे. त्यामुळे या प्रश्नाचे उत्तर "(3)" होईल. यास्तव **खालीलप्रमाणे** प्रश्न क्र. 201 समोरील उत्तर-क्रमांक "③" हे वर्तुळ पूर्णपणे छायांकित करून दाखविणे आवश्यक आहे.

प्र. क्र. 201. ① ② ● ④

अशा पद्धतीने प्रस्तुत प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाचा तुमचा उत्तरक्रमांक हा तुम्हाला स्वतंत्ररीत्या पुरविलेल्या उत्तरपत्रिकेवरील त्या त्या प्रश्नक्रमांकासमोरील संबंधित वर्तुळ पूर्णपणे छायांकित करून दाखवावा. **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

**कच्च्या कामासाठी जागा**

SEAL